**<u>अर्थसंकल्पीय अनुदान- वर्ष २००९-२०१०.</u>**
**नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था)**
**पाणीपुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी**
**सहाय्यक अनुदान.**
**लेखाशीर्ष वाय-२, २२१५, (२२१५ १६४७)**
**(वेतनेतर)**
**---------------------------------------**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७०९/नपापुयो/प्र.क्र. १०/पापु-२४**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२.**
**दिनांक : ३१ मार्च, २०१०.**

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांक मजीप्रा-१७०९/नपापुयो/प्र.क्र.१०/पापु-२४, दिनांक २७ जुलै, २००९.
२) अवर सचिव, पापु-२२ यांचे पत्र क्रमांक सुनिअ-२०१०/प्र.क्र.९०/पापु-२२, दिनांक ०३ मार्च, २०१०.

**<u>प्रस्तावना :-</u>**

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षाकरिता नागरी पाणी पुरवठा या कार्यक्रमासाठी नागरी भागातील पाणी पुरवठा कार्यक्रम, या योजनांतर्गत कार्यक्रमाखाली मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, १९१, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य-राज्य योजना-(०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी सहायक अनुदान.(२२१५ १६ ४७) ३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेतर), या लेखाशीर्षाखाली रुपये २३,४१,५६,०००/- (रुपये तेवीस कोटी एकेचाळीस लाख छपन्न हजार फक्त) इतके लेखा अनुदान व रुपये १२२,६०,०५,०००/- (रुपये एकशे बावीस कोटी साठ लाख पाच हजार फक्त) इतकी पुरवणी मागणी असे एकूण रुपये १४६,०१,६१,०००/- (रुपये एकशे सेहेचाळीस कोटी एक लाख एकसष्ट हजार फक्त) इतके अनुदान मंजूर करण्यात आले आहे. आता सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार रुपये ११६,८१,२९,०००/- (रुपये एकशे सोळा कोटी एक्याऐंशी लाख एकोणतीस हजार फक्त) एवढे अनुदान मंजूर करण्यात आले आहे.

२. वरील मंजूर सुधारीत अर्थसंकल्पीय अनुदानापैकी दिनांक २७ जुलै, २००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना रुपये २३,४१,५६,०००/- (रुपये तेवीस कोटी एकेचाळीस लाख छप्पन्न हजार फक्त) इतके लेखा अनुदान मुक्त करण्यात आलेले आहे. माहे मार्च, २०१० या कालावधीकरीता उर्वरित रुपये ९३,३९,७३,०००/- (रुपये त्र्यान्नव कोटी एकोणचाळीस लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतके अनुदान मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

(कृपया मागे पहावे.)

**शासन निर्णय -**

राज्यातील नागरी क्षेत्रातील नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनिस्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, या कार्यक्रमाखालील पाणी पुरवठा योजनांचे कार्यान्वयन महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून करण्यात येत असून या कार्यक्रमाखाली सन २००९-२०१० या आर्थिक वर्षामध्ये मंजूर असलेल्या एकूण रुपये ११६,८१,२९,०००/- (रुपये एकशे सोळा कोटी एक्याऐंशी लाख एकोणतीस हजार फक्त) इतक्या अनुदानापैकी या शासन निर्णयान्वये रुपये ९३,३९,७३,०००/- (रुपये त्र्यान्नव कोटी एकोणचाळीस लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतके अनुदान, सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना खालील अटींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

- फक्त ज्या शहराकरीता UIDSSMT या केंद्र पुरस्कृत योजनेतून निधी / योजना मंजूर नाही त्याच शहराकरीता या योजनेतून निधी देण्यात यावा.
- UIDSSMT या योजना मंजूर असलेल्या शहराकरीता निधी मुक्त करण्यात येऊ नये.
- लोकवर्गणी तसेच ज्या नगरपालिकांनी आपल्या हिस्सांची रक्कम जमा केलेली आहे अशा नगरपालिकांनाच त्यांनी जमा केलेल्या हिस्सांच्या प्रमाणात प्रत्यक्ष निधी वितरीत करण्यात यावा.
- वरील मुक्त केलेल्या अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.
- अनुदानाची रक्कम ज्याकरीता मंजूर व मुक्त करण्यात आली आहे, त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दिनांक ३१ मार्च, २०१० पर्यंत खर्च करावी.
- मुक्त अनुदानातून, होणा-या वाटपाची माहिती महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने शासनास कळवावी.
- मुक्त अनुदानातून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सदर योजनांकरिता केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर यांना किंवा खास अधिकार दिलेला या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहेत. याबाबत संबंधित कागदपत्रे, महालेखापाल किंवा खास अधिकार दिलेला विभागातील अधिकारी यांनी मागणी केल्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने त्यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावीत.
- मुंबई वित्तिय नियम, १९५९ मधील जोडपत्र-२ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने महालेखापालांना सादर करावेत.
- महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत किंवा जी अनुदाने यापुढील कालावधीत प्राप्त होतील त्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने द्यावयाची आहेत. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रावर सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी प्रतिस्वाक्षरी करावी. अशी प्रमाणपत्रे शासनाला स्विकारार्ह होतील.

- या मुक्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाला सादर करावे तसेच उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापालांनाही पाठवाव्यात.
- मुक्त केलेल्या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल विहित दिनांकास, लेखा अधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२ यांच्याकडे सादर करावा.
- या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात आलेले अनुदान सदस्य सचिव किंवा वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी (श्री.प्र.वा.पांढरीपांडे), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, यांच्या स्वाक्षरीने तयार केलेल्या आणि उप सचिव (श्री. दु.र.चंद्रिकापुरे ), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांनी प्रतिस्वाक्षरी केलेल्या देयकानुसार धनादेशाने देण्यात येईल. सदर देयक अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, शासकीय कुटीर, नरीमन पॉईंट, मुंबई- ४०००२१ यांना सादर करण्यात यावे. सदरहु रकमेचा धनादेश महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या नांवे देण्यात यावा.

३. सदर अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता, १९१, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य-राज्य योजना-(०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणीपुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी सहायक अनुदान. (२२१५ १६४७) ३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेतर), या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून यासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय हा नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १८८/व्यय-३, दिनांक ३१ मार्च, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov. in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३३१२११६३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( वि.गो. औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्स्प्रेस टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.
२) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी. जी. ओ. इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई - ४०००२०.
३) महालेखापाल, महाराष्ट्र- २, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर - ४४०००१
४) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई - ४००६१४. (पाच जादा प्रतींसह )
५) प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण. (सर्व)

(कृपया मागे पहावे.)

६) अधीक्षक अभियंता (मध्यवर्ती नियोजन, संकल्पचित्र व संनियंत्रण कक्ष), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवीन प्रशासकीय इमारत, दुसरा मजला,एस.टी.पी. कंपाऊंड, कन्हैया नगर जवळ, कोपरी कॉलनी, ठाणे (पूर्व), जि. ठाणे. पीनकोड-४००६०३

७) अधिदान व लेखा अधिकारी, शासकीय कुटीर, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.

८) निवासी लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय इमारत, सातवा मजला, वांद्रे - कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०००५१

९) वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय-३, बीयुडी- १८, अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

१०) नियोजन विभाग, कार्यासन क्रमांक १४४३ मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

११) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,०९,१३,१७,१८,२०,२२ मंत्रालय, मुंबई -४००३२.

१२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, संगणक शाखा, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

१३) निवड नस्ती, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, पापु-२४

-----------------------------------------------------------------------------------------